जिल्हा परिषद शिक्षकांच्या जिल्हांतर्गत
तसेच आंतरजिल्हा बदल्यांबाबत.

महाराष्ट्र शासन
ग्रामविकास विभाग
शासन निर्णय क्रमांक : जिपब-४८२०/प्र.क्र.२९०/आस्था-१४
२५, मर्झबान पथ, बांधकाम भवन, फोर्ट, मुंबई-४०० ००१,
दिनांक : ०४ मे, २०२२.

वाचा :

१) शासन निर्णय क्र. जिपब-४८२०/प्र.क्र.२९०/आस्था-१४, दिनांक ७.४.२०२१.
२) शासन निर्णय क्र. आंजिब-४८२०/प्र.क्र.२९१/आस्था-१४, दिनांक ७.४.२०२१.

प्रस्तावना :

जिल्हा परिषदेतील प्राथमिक शिक्षकांच्या जिल्हांतर्गत व आंतरजिल्हा बदल्या ह्या ऑनलाईन पध्दतीने करण्याबाबतचा निर्णय शासनाने यापूर्वी संदर्भ क्र .१ व २ येथील दिनांक ७.४.२०२१ च्या शासन निर्णयान्वये घेतलेला आहे. सदर शासन निर्णयामध्ये जिल्हा परिषद शिक्षकांच्या बदल्या सामान्यपणे वर्षातून एकदाच दिनांक १ मे ते ३१ मे पर्यंत करण्यात याव्यात, अशी तरतुद करण्यात आलेली आहे. तथापि, सन २०१९ मधील बदली प्रक्रिया ३१ मे नंतर पुर्ण करण्यात आली होती. त्यामुळे बदली झालेल्या शिक्षकांना १५ जुन नंतर शालेयकामी हजर व्हावे लागले. त्यामुळे सन २०१९ च्या बदली प्रक्रियेतील अतिदुर्गम डोंगराळ भागातील कार्यरत शिक्षक हे त्या पदावरील ३ वर्षाचा कालावधी दिनांक ३१ मे, २०२२ पर्यंत पुर्ण करीत नसल्यामुळे त्यांच्यावर सन २०२२ मध्ये होणाऱ्या बदली प्रक्रियेत अन्याय होणार असल्याने , यात सुधारणा करावी, अशा स्वरुपाची निवेदने शासनाकडे प्राप्त झालेली आहेत. याकरिता उक्त दिनांक ७.४.२०२१ च्या शासन निर्णयातील ३१ मे या ऐवजी जुन २०२२ अखेरपर्यंत परिगणना करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय :

सन २०२२ मध्ये होणाऱ्या बदल्यांकरिता पदावधीची परिगणना दिनांक ३१ मे ऐवजी दिनांक ३० जून, २०२२ पर्यंत करण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे. सदर प्रमाणे पदावधीची परिगणना ही केवळ सन २०२२ मध्ये होणाऱ्या बदल्यांसाठीच लागू असेल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०५०४१४५०१११०२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

K.G.Valvi
Digitally signed by K.G.Valvi
DN: cn=K.G.Valvi, o, ou=Rural Development Department, email=est14-rdd@mah.gov.in, c=IN
Date: 2022.05.04 16:10:28 +05'30'

(का. गो. वळवी)
उपसचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

१) मा.राज्यपाल महोदय यांचे सचिव, मलबार हिल, मुंबई.

२) मा.मुख्यमंत्री,महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव
३) मा.मंत्री / मा.राज्यमंत्री (ग्रामविकास) महाराष्ट्र राज्य यांचे खाजगी सचिव
४) मा.विरोधी पक्षनेता, विधानसभा / विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
५) सर्व सन्माननीय विधानसभा सदस्य / विधानपरिषद सदस्य, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय
६) मा.मुख्य सचिव यांचे उपसचिव, मंत्रालय, मुंबई
७) अपरमुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव सर्व मंत्रालयीन विभाग
८) विभागीय आयुक्त, विभागीय आयुक्त कार्यालये (सर्व)
९) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
१०) उपायुक्त (आस्थापना), विभागीय आयुक्त कार्यालये (सर्व विभाग)
११) माहिती व जनसंपर्क संचालनालय यांना प्रसिध्दीसाठी अग्रेषित.
१२) निवडनस्ती कार्यासन आस्था.१४, ग्रामविकास विभाग, मंत्रालय, मुंबई.